## १४ वर्षाच्या मुलासोबत गुजराचा ड्रोन निर्मितीचा करार

दरवर्षी आयोजित होणा–या वायब्रंट गुजरात जागतिक परिषदेत अनेक बडया कंपन्या आणि गुजरात सरकारमध्ये करार होतात.

यावर्षी वायब्रंट गुजरातमध्ये एक अनोखी घटना घडली. ज्याची सर्वत्र चर्चा आहे. या परिषदेत सहभागी झालेल्या एका १४ वर्षाच्या मुलाने गुजरात सरकारबरोबर ड्रोन निर्मितीचा तब्बल ५ कोटी रुपयांचा सामंजस्य करार केला आहे.

हर्षवर्धन झाला असे या मुलाचे नाव आहे. गुजरात सरकारच्या विज्ञान–तंत्रज्ञान विभागाने त्याच्यासोबत ड्रोन निर्मितीचा करार केला आहे. हर्षवर्धन युद्धभूमीवर शत्रूने पेरलेली भूसुरुंग शोधून ती निकामी करणारे ड्रोन विकसित करणार आहे.

आपल्या बिझनेस प्लानसह सहभागी झालेल्या हर्षवर्धनने ड्रोनचे तीन नमूने बनवले होते

## देशभरातील सर्व शाळांमध्ये इंग्रजीचा तास सक्तीचा करण्याची शिफारस

देशातील सर्व माध्यमिक शाळांमध्ये इंग्रजी हा विषय बंधनकारक करावा आणि देशभरात प्रत्येक भागात सरकारी इंग्रजी शाळा सुरु करावी अशी महत्त्वपूर्ण शिफारस शिक्षणविषयक समितीने पंतप्रधान नरेंद्र मोदींकडे केली आहे.

शिक्षण विभागातील सचिवांची एक समिती नेमण्यात आली होती. या समितीने देशभरातील राज्यांशी चर्चा करुन एक अहवाल तयार केला आहे. या अहवालात केंद्र सरकारला देशभरातील प्रत्येक शाळेत सहावी इयत्तेच्या पुढे इंग्रजी विषय बंधनकारक करण्याची शिफारस केली आहे.

याशिवाय प्रत्येक जिल्ह्यात गट पातळीवर सरकारतर्फे इंग्रजी माध्यमाची शाळा सुरु करावी असेही यात म्हटले आहे.

समितीने केंद्र सरकारला आणखी काही शिफारसी केल्या आहेत. यामध्ये शिक्षणाची गुणवत्ता तपासण्यासाठी दरवर्षी थर्ड पार्टी ऑडीट करावे असे म्हटले आहे.

आठवी इयत्तेतील विद्यार्थ्यांना करिअरविषयी योग्य नियोजन करता यावे यादृष्टीने त्यांचे समुपदेशन आणि कल चाचणी घ्यावी असे या समितीचे म्हणणे आहे.

याशिवाय देशातील प्रत्येक जिल्ह्यामध्ये कौशल्य विकास केंद्र सुरु करावे. २५ टक्क्यांपेक्षा जास्त ग्रामीण लोकसंख्या आणि अल्पसंख्यांक असलेल्या जिल्ह्यांमध्ये हे केंद्र सुरु करावे असे या समितीने म्हटले आहे.

देशातील सर्वोत्तम ५० महाविद्यालयांना अभिमत विद्यापीठाचा दर्जा देऊन त्यांना शैक्षणिक, आर्थिक आणि प्रशासकीय स्वायत्तता द्यावी. याशिवाय प्रत्येक विद्यापीठांमधील अभ्यासक्रमाचा दर तीन वर्षांनी आढावा घ्यावा असे या समितीने म्हटले आहे.

## स्पाइसजेटचा बोइंगसोबत २०५ विमानांसाठी करार

स्पाइसजेट ही कंपनी बोइंगकडून २०५ विमाने खरेदी करणार असून त्यासाठी १,५०,००० कोटी रुपयांचा करार करण्यात आला आहे.

भारतीय हवाई वाहतूक क्षेत्रातील मोठ्या सौद्यांपैकी एक सौदा म्हणून या व्यवहाराकडे पाहिले जात आहे.

नवी विमाने २० टक्के कमी इंधनावर चालतील. त्यातून कंपनीला खर्च कपात करण्यात मदत होईल.

# गुजरातने पहिल्यांदाच पटकावले रणजीचे विजेतेपद

रणजी करंडक स्पर्धेच्या अंतिम फेरीत गुजरातने मुंबईवर पाच गडी राखून विजय मिळवला आहे. कर्णधार पार्थिव पटेलच्या १४३ धावांच्या जोरावर गुजरातने मुंबईच्या ३१२ धावांचा यशस्वी पाठलाग केला.



पहिल्या डावात ढेपाळलेली फलंदाजी आणि चौथ्या डाव्यात निष्प्रभ ठरलेली गोलंदाजी यामुळे मुंबईला पराभव पत्करावा लागला.

# ऑनलाइन ७/१२' तयार करण्यात नाशिक आघाडीवर

हस्तलिखित व संगणकीकृत सातबारा यामधील साम्य अथवा तफावत तपासणी करून त्यात आवश्यक सुधारणा करण्याचे काम राज्यस्तरावर सुरु आहे.

नाशिक जिल्ह्यात एकूण १२ लाख १९ हजार ५५६ सातबारे आहेत. त्यापैकी ७ लाख २२ हजार ४२९ (५९.२४%) सातबारे एडीट मोड्यूलमध्ये तपासून व आवश्यक त्या दुरुस्त्या करून अंतिम करण्यात आले आहे.

ही राज्यातील सर्वात मोठी आकडेवारी ठरल्याने नाशिकने राज्यात प्रथम स्थान पटकावले आहे. हे सर्व सातबारे राज्य शासनाच्या ७/१२ 'आपले सरकार' या पोर्टलवर उपलब्ध आहेत.

या पोर्टलद्वारे खातेदार शेतकरी तथा सर्वसामान्य नागरिकांना ऑनलाइन पद्धतीने संगणकीकृत (डिजिटल सिग्नेचर) असलेला सातबारा आता घरबसल्या उपलब्ध होणार आहे. याकरिता नागरिकांना २३ रुपये शुल्क भरावे लागणार आहे.

आपले सरकार या वेबसाईट वरून आणि 'D i g i t a l 7/12' या महाऑनलाईनच्या मोबाईल ॲप्लिकेशनवरून देखील घरबसल्या नागरिकांना हे ७/१२ उपलब्ध करून घेता येणार आहे

## एफएम रेडियोच्या शेवटाची सुरूवात, नॉर्वेची आघाडी

गेल्या काही वर्षांमध्ये लोकप्रिय ठरलेल्या एफएम प्रणालीचे दिवसही भरत आले असून सध्याच्या रेडियोची उलटी गणना सुरू झाली आहे. यात युरोपमधील नॉर्वेने आघाडी घेतली आहे. हा देश एफएम रेडियो बंद करणारा पहिला देश ठरला आहे.

एफएमच्या जागी डिजिटल ऑडियो ब्रॉडकास्टिंग टेक्निकचा (डीएबी) उपयोग केला जाईल, असे अधिकाऱ्यांनी सांगितले आहे. ११ जानेवारी रोजी स्थानिक वेळेनुसार ११ वाजून ११ मिनिटांनी नॉर्वेच्या उत्तर भागातील नॉर्डलँड काऊंटीत एफएम प्रणाली बंद करण्यात आली.

देशाच्या संसदेने २०११ साली प्रणाली बदलण्यास संमती दिली होती. ती यंदा पूर्ण होईल. या वर्षीच्या १३ डिसेंबरपर्यंत संपूर्ण देशात एफएम रेडियो बंद होतील.एनआरके आणि अन्य खासगी प्रसारकांनी एफएम बंद करून डीएबीवरून प्रक्षेपण सुरू केले आहे.

राष्ट्रीय पातळीवर असे पाऊल उचलणारा नॉर्वे हा पहिला देश बनला आहे.

## मावळते उपराष्ट्राध्यक्ष जो बायडेन यांना अमेरिकेचा सर्वोच्च नागरी पुरस्कार

अमेरिकेचे मावळते उपराष्ट्राध्यक्ष जो बायडेन यांचा 'फ्रीडम मेडल' देऊन सत्कार करण्यात आला. अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष बराक ओबामा यांच्या हस्ते बायडेन यांना अमेरिकेचा हा सर्वोच्च नागरी पुरस्कार दिला गेला. हा पुरस्कार स्वीकारताना बायडेन यांना अश्रू अनावर झाले.